**“भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या विदयार्थ्यांना इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे” या योजनेकरिता ऑनलाईन प्रणाली (Portal) विकसित करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: धईशा-२०२३/प्र.क्र.२९९/योजना-२**
नवीन प्रशासकीय इमारत ,३ रा मजला
मंत्रालय, मुंबई-३२
दि. १५ मे, २०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण विभाग,क्रं.धईशाप्र-२०१९/प्र.क्र.७२/ शिक्षण, दि.०४/०९/२०१९.
२) शासन निर्णय, इतर मागास बहूजन कल्याण विभाग, क्र. धइशाप्र-२०२१/प्र.क्र.९५/ योजना-२ दि.५/३/२०२४
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नालॉजी कॉर्पोरेशन प्रा.लि. याचे दि.३.४.२०२५ रोजीचे पत्र
४) या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२८.४.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

“भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या विदयार्थ्यांना इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे” ही योजना राबविण्यास संदर्भाधिन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने, सदरहू योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता यावी. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांचा दर्जा, गुणांकन व शाळेतील सोयीसुविधा यांची तुलना करून विदयार्थ्यांना नामांकित शाळेची निवड करणे सुलभ व्हावे या करिता तसेच, विदयार्थ्यांना अर्ज करण्याची प्रकिया सुलभ व्हावी व विदयार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा अधिक परिणामकारक, पारदर्शक होण्याकरिता सदरहू योजनेकरिता ऑनलाईन प्रणाली (Portal) विकसित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

त्यानुषंगाने, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नालॉजी कॉर्पोरेशन प्रा.लि. यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथे नमुद दि.३.४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये, ऑनलाईन प्रणाली तयार करणे आणि सदर पोर्टलच्या संचालनासाठी वार्षिक देखभाल करार (एएमसी) च्या अनुषंगाने,सादर केलेल्या प्रस्तावास प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२८.४.२०२५ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

“भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या विदयार्थ्यांना इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे” या योजनेचे कार्यान्वयन पोर्टलव्दारे होण्याच्या अनुषंगाने, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नालॉजी कॉर्पोरेशन प्रा.लि. या महाराष्ट्र शासनाच्या उपक्रमाकडून एकीकृत ऑनलाईन प्रणाली तयार करणे, आणि सदर पोर्टलच्या संचालनासाठी वार्षिक देखभाल करार (एएमसी) करणे, यासाठी होणारा खर्च करण्यास तसेच, याबाबतचे मोबाईल ॲप विकसीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

याकरीता खालील तक्ता क्र.१ येथे नमुद बाबींच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या, रु. ४८,८१,८५८/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस लाख ऐक्याऐंशी हजार आठशे अठ्ठावण्ण फक्त) इतक्या अनावर्ती खर्चास व तक्ता क्र.२ येथे नमुद बाबींच्या अनुषंगाने, उद्भवणाऱ्या आवर्ती खर्चास (कर वगळून) प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे -

**तक्ता क्र.१ (अनावर्ती खर्च) –**

| Sr No | Description | Billable Amount |
|---|---|---|
| 1 | Application Development (One Time) | ₹ 43,28,769 |
| 2 | Security Audit charges (One Time) | ₹ 1,50,000 |
| 3 | UAT Server Cost (One Time) | ₹ 1,23,873 |
| | **Total** | **₹ 44,78,769** |
| 4 | MahaIT Administrative Charges (9%) | ₹ 4,03,089 |
| | **Total** | **₹ 48,81,858** |

**तक्ता क्र.२ (आवर्ती खर्च) –**

| Sr No | Description | Billable Amount |
|---|---|---|
| A | Application Support & Maintenance(Yearly) | ₹ 12,19,646 |
| | MahaIT Administrative Charges (9%) (सदर खर्च Sr. No A च्या ९% राहील.) | ₹ 60,986 |
| B | Production Server Configuration (Yearly) | ₹ 8,47,510.82 |
| | **Total** | **रु. 21,28,142 /-** |
| C | Service Charges (In INR) | • Rs. 1000/- for each Online Application submitted through Dhangar School Registration portal<br>• Rs. 5.50/- for each DBT fund transfer for who is eligible for Dhangar School Benefit.<br><br>सदर रकमेचा तपशील दरवर्षी प्राप्त होणाऱ्या अर्जाच्या संख्येनुसार ठरेल. याचा समावेश दरवर्षी पोर्टलच्या अनुषंगाने, होणाऱ्या आवर्ती खर्चात केला जाईल. |

(**टीप-** तक्ता क्र.२ येथे नमुद आवर्ती खर्चाची रक्कम ही अंदाजित असून त्यामध्ये आवश्यकतेनुसार वाढ व घट होवू शकते.)

०२.  याबाबतचा खर्च मागणी क्र. झेडजी-२,२२५१ सचिवालय सामाजिक सेवा, (०१) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राज्य योजना (०१)(०१) ई-शासन प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) १७, संगणक खर्च (२२५११३३४) या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२५-२६ करीता प्राप्त आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३.  सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.वि.अ.प्र-२०२३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/ भाग-२, दि.१७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका ,१९७८,भाग पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५१५१५५२०४१७३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2025.05.15 15:54:25 +05'30'

**( दिनेश रो. चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५. प्रधान सचिव, (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
७. संचालक, इतर मागास बहूजन कल्याण संचालनालय, म.रा., पुणे
८. संचालक, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नालॉजी कॉर्पोरेशन प्रा.लि.,मुंबई/पुणे
९. उप सचिव (योजना-२), इतर मागास बहूजन कल्याण,मंत्रालय,मुंबई
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकरी, मुंबई/नागपूर
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहूजन कल्याण,मंत्रालय,मुंबई
१३. कक्ष अधिकारी (संगणक कक्ष), इतर मागास बहूजन कल्याण,मंत्रालय,मुंबई
१४. निवडनस्ती (योजना-२)